जिल्हा परिषद अंतर्गत गट-क मधील सर्व संवर्गातील (वाहनचालक व गट-ड संवर्गातील पदे वगळून) सरळसेवेची रिक्त पदे भरण्याबाबत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.११/आस्था ८**

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,

मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

दिनांक: १५ मे, २०२३.

वाचा -

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रानिमं १२२२/प्र.क्र.५४/का.१३-अ, दि. ०४ मे, २०२२
२. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२२/प्र.क्र.११/आस्था-८, दि. २१ ऑक्टोबर, २०२२
३. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२२/प्र.क्र.११/आस्था-८, दि. १५ नोव्हेंबर, २०२२
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रानिमं १२२२/प्र.क्र.१३६/का.१३-अ, दि.२१ नोव्हेंबर, २०२२
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी२०१८/प्र.क्र.४२७/१६-ब, दि.०१ फेब्रुवारी, २०२३
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.४२७/१६-ब, दि.१० मे, २०२३
७. ग्रामविकास विभाग, शासन अधिसूचना दिनांक २७ एप्रिल, २०२३
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्र.दिव्यांग २०१९/प्र.क्र.२००/ दि.क.२, दि. ०५ ऑक्टोबर, २०२१

**परिपत्रक-**

उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ चे शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद अंतर्गत गट-क मधील सर्व संवर्गातील (वाहनचालक व गट-ड संवर्गातील पदे वगळून) सरळसेवेची रिक्त पदे भरण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करणेत आलेल्या आहेत. त्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ व ३ नुसार सरळसेवेची रिक्त पदे भरणेबाबत वेळापत्रक निश्चित करणेत आलेले होते. तसेच सामान्य प्रशासन विभागाकडील शासन निर्णय दि. २१ नोव्हेंबर २०२२ अन्वये भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र

लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट ब (अराजपत्रित) गट-क व गट-ड संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदे (टाटा कन्सल्टन्सी सर्व्हिसेस लिमिटेड) व आय.बी.पी.एस. (इंस्टीटयूट ऑफ बँकिंग पर्सोनेल सिलेक्शन) या कंपनीमार्फत राबविणेच्या सूचना निर्गमित करणेत आल्या आहेत. त्यामुळे सरळसेवेची रिक्त पदे वरील कंपनीमार्फत भरणेसाठी जिल्हा परिषदांमध्ये एकसूत्रता असणे आवश्यक आहे.

अ. जिल्हा परिषदांनी भरती प्रक्रिया राबविताना सुलभ संदर्भासाठी पुढील बाबी विचारात घ्याव्यात.

**१. भरती प्रक्रियेसाठी विचारात घ्यावयाचे वय व शैक्षणिक अर्हता आणि वय विचारात घ्यावयाचा दिनांक**

महाराष्ट्र शासनाचे विविध विभागांकडून वेळोवेळी निर्गमित करणेत आलेले शासन निर्णय, अधिसूचना, परिपत्रक इत्यादीद्वारे निश्चित केलेली वयोमर्यादा व शैक्षणिक अर्हता नमूद केलेली आहे.

त्याचबरोबर सद्यस्थितीत असलेली वयोमर्यादा दिनांक ०३ मार्च २०२३ चे शासन निर्णयानुसार दिनांक ३१ डिसेंबर २०२३ पर्यंत कमाल वयोमर्यादेत (खुल्या प्रवर्गासाठी ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी ४३ वर्षे) दोन वर्षे इतकी शिथिलता (खुल्या प्रवर्गासाठी ४० वर्षे व मागास प्रवर्गासाठी ४५ वर्षे) विचारात घेणेत यावी.

तसेच विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेपेक्षा भिन्न कमाल वयोमर्यादा विहित केली आहे, अशा पदांसाठी देखील दिनांक ३१ डिसेंबर २०२३ पर्यंत विहित कमाल वयोमर्यादेत दोन वर्षे इतकी शिथिलता देय राहील. **(संदर्भासाठी सोबत परिशिष्ठ-"अ" जोडणेत आले आहे.)**

त्याचबरोबर ग्रामविकास विभाग, शासन निर्णय दि. २१ ऑक्टोबर, २०२२ नुसार मार्च २०१९ च्या जाहिरातीप्रमाणे अर्ज केलेले / भरलेले आहेत, अशा उमेदवारांचे वयाधिक्य झाले असल्याने ते परीक्षेस बसण्यास अपात्र होऊन त्यांचे नुकसान होऊ नये, याकरिता सन २०२३

मध्ये प्रसिध्द होणाऱ्या सरळसेवा भरती प्रक्रियेच्या जाहिरातमध्ये त्यांना वयोमर्यादेत सूट देण्याबाबतची दक्षता घ्यावी.

तसेच भरती प्रक्रियेसाठी उमेदवारांचे वय निश्चित करण्यासाठी **दि. ०१ जून २०२३** हा दिनांक निश्चित करणेत येत आहे.

**२. वृत्तपत्रामध्ये प्रसिध्द करावयाची नमुना जाहिरात व जिल्हा परिषदेच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावयाची सविस्तर सूचना**

सोबत नमूना **परिशिष्ठ -"ब"** व **"क"** जोडणेत आलेले आहे.

**३. ऑनलाईन पद्धतीने घेतलेल्या स्पर्धा परीक्षांच्या गुणवत्ता यादी व निवड यादी -**

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय दि. ०४ मे २०२२ मधील मुद्दा क. १० नुसार निवडसूचीत समाविष्ट करणेसाठी विचारात घ्यावयाच्या उमेदवारांची संख्या नमूद केलेली आहे, त्यानुसार कार्यवाही करणेची दक्षता घ्यावी.

भरती प्रक्रियेच्या ऑनलाईन पद्धतीने घेतलेल्या स्पर्धा परीक्षांच्या गुणवत्ता यादी व निवड यादी कंपनीच्या सर्व्हर वरून विहित कालावधीत व विहित मार्गाने प्राप्त करून घेण्याची जबाबदारी जिल्हा परिषदांची राहील.

**४. उमेदवारांची कागदपत्र पडताळणी -**

कंपनी कडून प्राप्त झालेल्या निवड यादीमधील उमेदवारांची जाहिरातीमध्ये दिलेल्या पात्रतेनुसार आवश्यक त्या सर्व कागदपत्रांची पडताळणी करून घेणेसाठीचे नमूना **परिशिष्ठ-"ड"** सोबत जोडणेत आलेले आहे.

तसेच जाहिरातीमध्ये दर्शविलेल्या रिक्त पदांनुसार प्राप्त झालेल्या उमेदवारांच्या कागदपत्राची पडताळणी करताना ती ज्या कार्यालयाकडून निर्गमित करणेत आलेली आहे अथवा ती पडताळणी करण्यासाठी ज्या कार्यालयाला अधिकृत करणेत आले आहे, अशा

कार्यालयाकडे पडताळणीसाठी पाठवून दोन महिन्यांच्या आत पडताळणी करून घेणेची दक्षता जिल्हा परिषदांनी घेणेत यावी.

**५. अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) सरळसेवेची पदे भरणेबाबत**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. ०१ फेब्रुवारी २०२३, शासन शुद्धीपत्रक दि. २८ फेब्रुवारी २०२३ व शासन निर्णय दि. १० मे २०२३ नुसार अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) सरळसेवेची पदे निश्चित करून ती भरण्याची दक्षता घ्यावी. तसेच अनुसूचित क्षेत्रातील पदे स्थानिक अनुसूचितीतील जमातीतील उमेदवारांमधून भरताना स्थानिक अनुसूचित क्षेत्रात काम करणारे बिगर अनुसूचित जमातीचे कर्मचारी अथवा बिगर अनुसूचित क्षेत्रात काम करणारे अनुसूचित जमातीचे उमेवारांचे समायोजनाची प्रक्रिया ही नव्याने निवड झालेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यापूर्वी पार पाडण्याची दक्षता जिल्हा परिषदांनी घ्यावी.

**६. निवड झालेल्या उमेदवारांना द्यावयाचा नियुक्ती आदेश -**

नियुक्ती आदेश देताना त्या त्या संवर्गासाठी आवश्यक असलेल्या अर्हतेच्या बाबतीतील अटी व शर्ती, सुधारित शासन आदेश विचारात घेऊन निर्गमित करावेत. तसेच नियुक्ती आदेश हे जिल्हा परिषदांनी आवश्यकतेनुसार २D Barcode वापरून निर्गमित करावेत.

**ब.** ऑनलाईन पद्धतीने परीक्षा घेताना परीक्षेच्या प्रत्येक सत्रातील विद्यार्थी हे सामाजिक व समांतर आरक्षणानुसार अर्ज केल्याप्रमाणे यादृच्छिक (Random) पद्धतीने उमेदवार परीक्षा कक्षामध्ये बसतील, अशा रितीने परीक्षेचे नियोजन करण्याची दक्षता घ्यावी.

**क.** संदर्भाधिन शासन परिपत्रक दि. ०५ ऑक्टोबर २०२१ अन्वये दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील कलम २(आर) नुसार लक्षणीय (Benchmark) दिव्यांग व्यक्तींना स्पर्धा परीक्षेस बसताना लेखनिक उपलब्ध करून देणेबाबतच्या सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्याप्रमाणे लक्षणीय (Benchmark) दिव्यांगत्व असलेल्या दिव्यांग व्यक्तींना लेखनिक पुरविणे आणि / अथवा अनुग्रह कालावधी देणेसाठीची कार्यवाही स्पष्ट केलेली आहे. त्यानुसार जिल्हा परिषदांना

लक्षणीय (Benchmark) दिव्यांग व्यक्तींना लेखनिक पुरविणे आणि / अथवा अनुग्रह कालावधी देणेबाबतची कार्यवाही करावी. तसेच जिल्हा परिषदांना लक्षणीय (Benchmark) दिव्यांग व्यक्तींना लेखनिक पुरविणेची उमेदवाराने मागणी केल्यास जिल्हा परिषदांनी प्रचलित दरानुसार लेखनिक पुरविणेत यावा. त्यासाठीचा येणारा खर्च परीक्षा शुल्कातून करावा किंवा त्यासाठी जिल्हा परिषदेतील स्व निधीतून तरतूद करावी. उमेदवाराने परीक्षेपुर्वी लेखनिकाची मागणी न केल्यास ऐनवेळी लेखनिक पुरविता येणार नाही.

**ड.** जिल्हा निवड समिती मार्फत राबविणेत येणाऱ्या जिल्हा परिषदेच्या भरती प्रक्रियेवर देखरेख व तपासणी करण्याचे अधिकार विभागीय आयुक्त यांचे राहतील.

**ई.** मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी दक्षतापूर्वक परीक्षा प्रक्रिया पार पाडल्याचा अहवाल विभागीय आयुक्त यांना पाठवावा.

**फ.** उपरोक्त निर्गमित केलेल्या सूचनेनुसार मुद्दा क्र. २, ४, ६ यामध्ये बदल करण्याची आवश्यकता वाटल्यास ते बदल करण्याची मुभा जिल्हा परिषदांनी राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक **२०२३०५१२१६५४५५२०२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POPAT D. DESHMUKH

Digitally signed by POPAT D. DESHMUKH
DN: cn=POPAT D. DESHMUKH, o=Rural Development Department, ou, email=P.d.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2023.05.15 17:16:58 +05'30'

**(पो. द. देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव
२. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव

३. मा.मंत्री (ग्रामविकास), यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य), यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास), यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव महाराष्ट्र राज्य.
७. अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अप्पर मुख्य सचिव (मा.व तं.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (लेवको), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव (विसु), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, गो.ते. रुग्णालय, मंबई
१३. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१४. जिल्हाधिकारी (सर्व)
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१७. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (सा.प्र.वि.), जिल्हा परिषद, (सर्व)
१८. जिल्हा समाज कल्याण अधिकारी (सर्व)
१९. जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, (सर्व)
२०. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी (सर्व)
२१. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
२२. निवडनस्ती, कार्यासन आस्था-८.

# परिशिष्ट – "अ"

## Age Limit as per Government Rules

| Sr. no. | Category | Minimum Age limit | Revised age limit as per Govt. Resolution dated ३ March २०२३ till ३१ December २०२३ |
|---|---|---|---|
| १ | Open | १८ | ४० |
| २ | Backward Class | १८ | ४५ |
| ३ | Handicapped | १८ | ४७ |
| ४ | Project Affected | १८ | ४७ |
| ५ | Earthquake Affected | १८ | ४७ |
| ६ | Diploma / Graduates Anshkalin holder | १८ | ५७ |
| ७ | Ex-serviceman | - | (Discharge Date + ५ year) |
| ८ | Ex-serviceman Handicapped | - | ४७ |
| ९ | Sportsman | १८ | ४५ |
| १० | Orphan | १८ | ४५ |
| ११ | (i) Children of Freedom Fighter<br>(ii) १९९१ Census Staff<br>(iii) Post-१९९४ Election Employees<br>(iv) State Government employee/ Zilla Parishad employee | १८ | ४७ |

| Sr. no. | Category | Minimum Age limit | Revised age limit as per Govt. Resolution dated ३ March २०२३ |
|---|---|---|---|
| १ | Health Worker (Female) Open | १८ | ४२ |
| | Health Worker (Female) Backward Class | १८ | ४५ |
| २ | Health Worker (male) | १८ | ४७ |
| ३ | Supervisor Open | २१ | ४० |
| ४ | Supervisor Backward Class | २१ | ४५ |
| ५ | Civil Engineering Assistant (age limit may be relaxed subject to the verification of their certificate by the Government Technical Education Department in the case of candidates who have passed the Civil Engineering Assistant course of one-year duration conducted by the Government Technical Institute of Technical Education Department between १९८०-८१ to १९८६-८७) | १८ | ४९ |

*For those who had filled the application form for March २०१९ Recruitment, maximum age criteria will not be applicable, But the age of candidate should not be more than ५८ years at the time of appointment.*

परिशिष्ठ - "ब"

# जिल्हा परिषद _____
# जाहीर प्रकटन

## सरळसेवा भरती प्रक्रिया २०२३

जिल्हा परिषद __________________ च्या आस्थापनेवरील गट-क संवर्गामधील रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी जाहिरात क्र. ०१/२०२३ दिनांक / /२०२३ अन्वये प्रसिध्द करण्यात येत आहे.

प्रस्तुत जाहिरातीमधील पदे जिल्हा परिषद __________________ च्या अधिनस्त असलेल्या विविध विभागांमधील आहेत. त्यामुळे तुलनात्मक स्पर्धा होण्यासाठी पुरेसे उमेदवार असणे आवश्यक आहे. तसेच प्रस्तुत भरतीसाठी पुरेसा प्रतिसाद प्राप्त होण्याकरिता जाहिरात देण्यात येत आहे. त्यामुळे सदर निवेदनाद्वारे कळविण्यात येते की, जाहिरात क्र. ०१/२०२३ नुसार गट-क मधील विविध संवर्गाची एकूण ___________________ पदांकरिता अर्ज करण्याचा कालावधी दिनांक

/ /२०२३ पासून ते दिनांक / /२०२३ रोजी पर्यंत आहे.

**इच्छुक** उमेदवारांनी www. .com या लिंकवर **दिनांक / /२०२३** रोजीचे **रात्री २३:५९ वाजेपर्यंत** Online **पद्धतीने** अर्ज करावा. उपरोक्त जाहिरातीच्या अनुषंगाने **रिक्त पदांचा तपशिल, पदांकरिता आवश्यक शैक्षणिक अर्हता, वेतनश्रेणी, वयोमर्यादा, परीक्षा शुल्क, ऑनलाईन अर्ज करण्याची पद्धत, अर्ज करण्याची मुदत व इतर आवश्यक अटी व शर्ती** इत्यादी बाबी जिल्हा परिषद __________________ च्या www. .com या लिंकवर पाहण्यास उपलब्ध आहे.

दिनांक - / /२०२३

मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा परिषद ________________

स्थळ -

## परिशिष्ठ - “क”

**जिल्हा परिषद _______________**
**जिल्हा परिषद, _________ अंतर्गत गट-क मधील सरळसेवेची रिक्त पदे भरण्यासाठीची जाहिरात**
**जाहिरात क्रमांक:- ०१/२०२३**

---

महाराष्ट्र शासन सामान्य प्रशासन विभाग यांचे कडील शासन निर्णय क्रमांक प्रनिमं १२२२/प्र.क्र.५४/का.१३- अ दिनांक ४ मे २०२२, महाराष्ट्र शासन ग्रामविकास विभागाकडील शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०२२/प्र.क्र.११/आस्था-८ दिनांक १० मे २०२२ महाराष्ट्र शासन वित्त विभागाचे शासन निर्णय क्रमांक पदनि-२०२२ /प्र.क्र.२/२०२२/आ.पु.क. दिनांक ३० सप्टेंबर २०२२, महाराष्ट्र शासन ग्रामविकास विभाग यांचे शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.११/आस्था-८ दिनांक २१ ऑक्टोबर २०२२, महाराष्ट्र शासन, वित्त विभागाकडील शासन निर्णय क्र. पदनि-२०२२/प्र.क्र.२०./२०२२/आ.पु.क. दि.३१ ऑक्टोबर २०२२, महाराष्ट्र शासन ग्रामविकास विभाग यांचे शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.११/आस्था-८ दिनांक १५ नोव्हेंबर २०२२, महाराष्ट्र शासन सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक प्रानिमं १२२२/ प्र.क्र. १३६/का-१३ ब दिनांक २१ नोव्हेंबर २०२२ अन्वये विहित तरतुदी आणि निर्देशानुसार जिल्हा परिषद, ______ अंतर्गत गट - क मधील सर्व संवर्गाची (वाहनचालक व गट - ड संवर्गातील पदे वगळून ) विविध विभागाकडील सरळसेवेने भरावयाची रिक्त पदे माहे _________________ अखेर संभाव्य रिक्त होणाऱ्या गट क संवर्गातील **अनुसूचित क्षेत्राबाहेरील (बिगर पेसा) व महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभागाकडील शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.४२७/१६-ब, दि.०१ फेब्रुवारी २०२३ नुसार मा.राज्यपाल महोदयांच्या दि. २९ ऑगस्ट २०१९ च्या अधिसूचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) १७ संवर्गातील सरळसेवेची पदे भरणेबाबत सूचना प्राप्त आहेत. त्यानुसार शासन निर्णयामध्ये नमूद १३ जिल्ह्यातील अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) रिक्त पदांची** भरती करीता प्रस्तूत जाहिरातीत नमूद केलेप्रमाणे शैक्षणिक अर्हता व इतर बाबींची पुर्तता करणाऱ्या पात्र उमेदवारांकडून ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागविण्यात येत आहेत.

**सरळसेवेने भरावयाच्या पदाकरीता** www.            .com **या संकेतस्थळावर अधिकृत अर्ज मागविण्यात येत आहेत. उमेदवारांनी** www.            .com **या _________ जिल्हा परिषदेच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेली सविस्तर जाहिरात वाचून त्याप्रमाणे विहित मुदतीत अर्ज सादर करावेत. ऑनलाईन भरलेल्या अर्जाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रकारे भरलेले अर्ज स्विकारले जाणार नाहीत.**

**सरळसेवा भरती प्रक्रिया संदर्भातील सविस्तर जाहिरात** www.            .com **या _________ जिल्हा परिषदेच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून उमेदवारांनी जाहिरातीत नमूद संपुर्ण माहिती काळजीपुर्वक वाचून ऑनलाईन** (Online) **पद्धतीनेच** www.            .com **या**

**संकेतस्थळावर आपले अर्ज सादर करावेत. सदर संकेतस्थळाला भरती प्रक्रियेदरम्यान वेळोवेळी भेट देऊन भरती प्रक्रिये संबंधित आवश्यक अद्ययावत माहिती प्राप्त करून घेण्याची जबाबदारी उमेदवाराची राहील.**

- **अनुसूचित क्षेत्राबाहेरील (बिगर पेसा) यामध्ये कोण अर्ज करू शकतात.**

जे उमेदवार महाराष्ट्राचे रहिवासी आहेत, असे उमेदवार आणि महाराष्ट्र शासन सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. मकसी१००७/प्र.क्र.३६/का.३६ दिनांक १० जुलै २००८ अन्वये महाराष्ट्र कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगीतलेल्या ८६५ गांवातील मराठी भाषिक उमेदवारांना **अनुसूचित क्षेत्राबाहेरील (बिगर पेसा)** पदांसाठी अर्ज करू शकतात.

- **अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) यामध्ये कोण अर्ज करू शकतात.**

मा.राज्यपाल महोदयांच्या दि. २९/०८/२०१९ च्या अधिसूचनेनुसार महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील गावांमधील **"स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवार"** सदर **अनुसूचित क्षेत्रातील (पेसा)** पदांसाठी अर्ज करू शकतात.
(स्पष्टीकरण - मा.अधिसूचनेच्या प्रयोजनार्थ, **"स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवार"** याचा अर्थ, जे उमेदवार स्वत: किंवा त्यांचे वैवाहीक साथीदार किंवा ज्यांचे मातापिता किंवा आजी-आजोबा हे दिनांक २६ जानेवारी १९५० पासून आजपर्यंत संबंधित जिल्ह्यांच्या अनुसूचित क्षेत्रांत सलगपणे राहत आले आहेत, असे अनुसूचित जमातीचे उमदेवार, असा आहे.)

**१. ऑनलाईन अर्ज सादर करण्याचे वेळापत्रक**

| अ.क्र. | तपशील | दिनांक |
|---|---|---|
| १ | ऑनलाईन पद्धतीने अर्ज नोंदणी सुरू होण्याचा दिनांक | |
| २ | ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याचा अंतिम दिनांक | |
| ३ | ऑनलाईन पद्धतीने परीक्षा शुल्क भरणेची अंतिम मुदत | |
| ४ | परीक्षेसाठी ऑनलाईन प्रवेशपत्र उपलब्ध होण्याचा दिनांक | **परीक्षेच्या आधी ७ दिवस** |

परीक्षेचा दिनांक, वेळ व केंद्र प्रवेशपत्रामध्ये नमूद केले जाईल. परीक्षेचे प्रवेशपत्र हे परीक्षेपुर्वी ७ दिवस आधी www.            .com **या संकेतस्थळावर** -Date for Call Letter Download◦ **या टॅबवर क्लीक करून प्राप्त करून घेता येईल.**

**२. परीक्षा शुल्क**

| | |
|---|---|
| २.१ | खुल्या प्रवर्गाच्या उमेदवारांसाठी रू. १०००/- |
| २.२ | मागास प्रवर्गाच्या उमेदवारांसाठी रू. ९००/- |
| २.३ | अनाथ उमेदवारांसाठी रू.९००/- |

| | |
|---|---|
| २.४ | माजी सैनिक / दिव्यांग माजी सैनिक यांचेसाठी परीक्षा शुल्क माफ राहील. |
| २.५ | फक्त ऑनलाईन पद्धतीनेच परीक्षा शुल्क स्विकारले जाईल. |
| २.६ | परीक्षा शुल्क भरल्याबाबतची ऑनलाईन चलनाची प्रत ही ऑनलाईन पद्धतीने केलेल्या अर्जाच्या प्रतीसोबत कागदपत्रांच्या तपासणीचे वेळी सादर करणे आवश्यक राहील. |
| २.७ | उमेदवारास प्रसिध्द केलेल्या जाहिरातीमधील एकापेक्षा अधिक पदाकरीता अर्ज करावयाचे असल्यास अशा प्रत्येक पदासाठी स्वतंत्र अर्ज सादर करून त्यासाठी स्वतंत्र परीक्षा शुल्क भरणे बंधनकारक राहील. |

## ३. अर्ज भरणे व सादर करणेबाबत आवश्यक सूचना

| | |
|---|---|
| ३.१ | उमेदवारांनी अर्ज भरण्यापूर्वी www. .com/mr/recruitments या लिंकवर जाऊन जाहिरात सविस्तर अभ्यासावी व नंतरच आपला अर्ज भरावा |
| ३.२ | उमदेवारास अर्ज सादर करताना काही समस्या उद्भवल्यास http:// www.cgrs.ibps.in/ या लिंकवर अथवा १८००२२२३६६/१८०० १०३४५६६ या हेल्पलाईनवर संपर्क साधावा |
| ३.३ | ऑनलाईन फी भरणेसाठी दि. / /२०२३ वेळ २३.५९ पर्यंत मुदत राहील |
| ३.४ | अर्जात हेतूपुरस्सर खोटी माहिती देणे किंवा खरी माहिती दडवून ठेवणे किंवा त्यात बदल करणे किंवा पाठविलेल्या दाखल्यांच्या प्रतीतील नोंदीत अनधिकृतपणे खाडाखोड करणे किंवा खाडाखोड केलेले वा बनावट दाखले सादर करणे, परीक्षा कक्षातील गैरवर्तन, परीक्षेचे वेळी नक्कल (copy) करणे, वशीला लावण्याचा प्रयत्न करणे यासारखे अथवा परीक्षा कक्षाचे बाहेर अथवा परीक्षेनंतरही गैरप्रकार करणाऱ्या उमेदवारांना गुण कमी करणे, विशिष्ट किंवा सर्व परीक्षांना वा निवडींना अपात्र ठरविणे यापैकी प्रकरणपरत्वे योग्य त्या शिक्षा करणेचा तसेच प्रचलित कायदा व नियमांचे अनुषंगाने योग्य ती कारवाई करणेचे अधिकार मा.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद _______________ यांना राहतील. तसेच विहीत केलेल्या अर्हतेच्या अटी पूर्ण न करणारा अथवा गैरवर्तणूक करणारा उमेदवार कोणत्याही टप्प्यावर निवड होण्यास अपात्र ठरेल. तसेच निवड झाल्यानंतर देखील सेवा समाप्तीस पात्र ठरेल. |
| ३.५ | वयाच्या पुराव्यासाठी सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेला जन्माचा दाखला, शाळा सोडल्याचा दाखला, माध्यमिक (एस.एस.सी) परीक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र, वय व अधिवासाबाबत शासनाकडील सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र ग्राह्य धरणेत येईल. |
| ३.६ | शैक्षणिक अर्हतेसंदर्भात आवश्यक माहिती दिलेल्या क्रमाने नमूद करावी. संबंधित परीक्षेच्या गुणपत्रकावरील दिनांक हा शैक्षणिक अर्हता धारण केल्याचा दिनांक समजणेत येईल व त्या आधारे उमेदवाराची पात्रता ठरविणेत येईल. |
| ३.७ | गुणांऐवजी श्रेणी पध्दत असल्यास कागदपत्र पडताळणीचे वेळी उमेदवारांनी गुणपत्रकासोबत श्रेणीची (Grade) यादी सादर करावी. |
| ३.८ | ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करण्याची सर्वसाधारण प्रक्रिया खालीलप्रमाणे आहे.<br>१. प्रोफाईल निर्मिती / प्रोफाईल अद्ययावत करणे.<br>२. अर्ज सादरीकरण<br>३. शुल्क भरणा |

३.९ प्रोफाईल निर्मिती / प्रोफाईल अद्ययावत करणे.

१. www.                .com या संकेतस्थळावर वापरकर्त्यांने प्रोफाईल निर्मिती करण्याकरीता “नवीन वापरकर्त्यांची नोंदणी” ("Click here for New Registration") वर क्लिक केल्यानंतर यंत्रणा लॉग-इन पृष्ठ प्रदर्शित करेल. नवीन खाते (वापरकर्त्याचे नाव Login व Password) निर्माण करण्यासाठी लॉग-इन पृष्ठाव्दारे विचारलेली सर्व माहिती भरून नोंदणीची प्रक्रिया पूर्ण करावी.

२. प्रोफाईलव्दारे माहिती भरताना उमेदवाराने स्वतःचाच वैध ई-मेल आयडी, वैध भ्रमणध्वनी क्रमांक व जन्म दिनांक नोंदविणे आवश्यक आहे.

३. उमेदवारांकडे नित्य वापरात असेल असा ई-मेल आयडी व भ्रमणध्वनी क्रमांक असणे आवश्यक आहे. तसेच भरती प्रक्रिये दरम्यान पत्रव्यवहार, प्रवेशपत्र आणि इतर माहिती ऑनलाईन देण्यात येणार असल्याकारणामुळे भरती प्रकियेच्या संपूर्ण कालावधीमध्ये नोंदणीकृत सदर ई-मेल आयडी व भ्रमणध्वनी क्रमांक वैध / कार्यरत राहणे आवश्यक आहे.

४. वरीलप्रमाणे प्रोफाईलची निर्मिती झाल्यानंतर वापरकर्त्याने स्वतःच्या Login व Password व्दारे प्रवेश करुन प्रोफाईलमध्ये विचारलेली वैयक्तिक माहिती, संपर्क तपशील, इतर माहिती, शैक्षणिक अर्हता, अनुभव इत्यादी संदर्भातील तपशीलाची अचूक नोंद करावी.

५. फोटो व स्वाक्षरी अपलोड करणे :-

नोंदणीची प्रक्रिया व प्रोफाईलव्दारे विचारलेली माहिती भरुन झाल्यानंतर उमेदवाराने स्वतःचे छायाचित्र / फोटो (रुंदी ३.५ से.मी. x उंची ४.५ से.मी.) व स्वतःची स्वाक्षरी स्कॅन करुन खालीलप्रमाणे अपलोड करावी

1) एका पांढ-या स्वच्छ कागदावर विहित आकाराचा फोटो चिकटवावा. फोटोवर स्वाक्षरी करू नये अथवा फोटो साक्षांकित करु नये. वरील सुचनांनुसार फोटो कागदावर व्यवस्थित चिकटवावा, स्टॅपल अथवा पिनिंग करु नये. फक्त स्कॅनरवर ठेवून थेट स्कॅन करता येईल.
2) फोटोचा आकार खालीलप्रमाणे असणे गरजेचे आहे.




3) छायाचित्र अर्जाच्या दिनांकाच्या सहा महिन्याहून आधी काढलेले नसावे आणि ते ऑनलाईन परिक्षेच्या वेळी उमेदवाराच्या रुपाशी जुळणारे असावे.
4) विहित आकार/ क्षमतेप्रमाणे काळ्या शाईच्या (बॉल) पेनने स्वच्छ कागदावर स्वाक्षरी करावी. उमेदवाराने स्वतः स्वाक्षरी करणे आवश्यक आहे. अन्य कोणत्याही व्यक्तीने स्वाक्षरी केल्यास

ती ग्राह्य धरण्यात येणार नाही.

५) वरीलप्रमाणे विहित आकारातील फक्त फोटो व स्वाक्षरी वेगवेगळी स्कॅन करावी. संपूर्ण पृष्ठ अथवा फोटो व स्वाक्षरी एकत्रित स्कॅन करु नये.

६) स्कॅन करुन अपलोड केलेली स्वाक्षरी, प्रवेशपत्र / हजेरीपट व तत्सम कारणासाठी वापरण्यात येईल. परीक्षेच्या वेळी, प्रत्यक्ष कागदपत्रे तपासणीच्या वेळी व अन्य कोणत्याही वेळी अर्ज भरताना केलेली स्वाक्षरी व फोटो न जुळल्यास उमेदवारास अपात्र ठरविण्यात येईल, अथवा अन्य कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**A. अर्ज नोंदणी**

१. उमेदवारांनी www. .com या संकेतस्थळावर जाण्यासाठी https:// www. .com/mr/recruitments "APPLY ONLINE" या पर्यायावर क्लिक करा जे एक नवीन स्क्रीन उघडेल.

२. अर्ज नोंदणी करण्यासाठी, "नवीन नोंदणीसाठी येथे क्लिक करा" (Click here for New Registration) टॅब निवडा आणि नाव, संपर्क तपशील आणि ईमेल आयडी प्रविष्ट करा. प्रणालीद्वारे तात्पुरता नोंदणी क्रमांक आणि पासवर्ड तयार केला जाईल आणि स्क्रीनवर प्रदर्शित केला जाईल. उमेदवाराने तात्पुरती नोंदणी क्रमांक आणि पासवर्ड नोंदवावा. तात्पुरती नोंदणी क्रमांक आणि पासवर्ड दर्शविणारा ईमेल आणि एस.एम.एस. देखील पाठविला जाईल.

३. जर उमेदवार एकाच वेळी अर्ज भरू शकत नसेल, तर तो "सेव्ह आणि नेक्स्ट" (Save & Next) टॅब निवडून आधीच एंटर (Enter) केलेला डेटा जतन करू शकतो. ऑनलाइन अर्ज सबमिट (Submit) करण्यापूर्वी उमेदवारांना ऑनलाइन अर्जातील तपशीलांची पडताळणी करण्यासाठी "सेव्ह आणि नेक्स्ट" " (Save & Next) सुविधेचा वापर करण्याचा सल्ला देण्यात येत आहे आणि आवश्यक असल्यास त्यात बदल करावा. दृष्टिहीन उमेदवारांनी अर्ज काळजीपूर्वक भरावा आणि अंतिम सबमिशन करण्यापूर्वी ते बरोबर असल्याची खात्री करण्यासाठी तपशीलांची पडताळणी करून घ्यावी.

४. उमेदवारांनी ऑनलाइन अर्जातील तपशील काळजीपूर्वक भरावेत आणि त्याची पडताळणी करावी, कारण -पूर्ण नोंदणी॰ (COMPLETE REGISTRATION BUTTON) बटणावर क्लिक केल्यानंतर कोणताही बदल शक्य होणार नाही/करणे शक्य होणार नाही.

५. उमेदवाराचे नाव किंवा त्याचे/तिचे वडील/पती इ.चे नाव अर्जामध्ये बरोबर लिहिलेले असावे, जसे ते प्रमाणपत्र/गुणपत्रिका/ओळख पुराव्यामध्ये दिसते. कोणताही बदल / तफावत आढळल्यास उमेदवारी अपात्र ठरू शकते.

६. 'तुमचे तपशील सत्यापित करा॰ (-Validate your details॰) आणि -जतन करा आणि पुढील' (-Save & Next॰) बटणावर क्लिक करून तुमचा अर्ज जतन करा.

| | |
|---|---|
| | ७. फोटो आणि स्वाक्षरी स्कॅनिंग आणि अपलोड करण्याच्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये दिलेल्या वैशिष्ट्यांनुसार उमेदवाराने फोटो आणि स्वाक्षरी अपलोड करण्याची कार्यवाही करावी.<br><br>८. नोंदणीपूर्वी संपूर्ण अर्जाचे पूर्वावलोकन आणि पडताळणी करण्यासाठी -पूर्वावलोकन॰ (-Preview॰) टॅबवर क्लिक करा.<br><br>९. आवश्यक असल्यास तपशील सुधारावा आणि छायाचित्र, स्वाक्षरी आणि इतर तपशील बरोबर असल्याची पडताळणी आणि खात्री केल्यानंतरच 'नोंदणी पूर्ण वर क्लिक करा॰ (COMPLETE REGISTRATION).<br><br>१०. 'पेमेंट'(Payment) टॅबवर क्लिक करा आणि पेमेंटसाठी पुढे जावे व -सबमिट॰ (Submit) बटणावर क्लिक करावे.<br><br>**B. परीक्षा शुल्क भरणे**<br><br>ऑनलाइन मोड:<br>१. डेबिट कार्ड (RuPay/Visa/Master Card/Maestro), क्रेडिट कार्ड, इंटरनेट बँकिंग, IMPS, कॅश कार्डस् / मोबाइल वॉलेट वापरून पेमेंट केले जाऊ शकते.<br>२. व्यवहार यशस्वीरीत्या पूर्ण झाल्यावर, एक ई- पावती तयार होईल.<br>३. 'ई- पावती' तयार न होणे अयशस्वी फी प्रदान दर्शविते.<br>४. उमेदवारांनी ई- पावती आणि फी तपशील असलेल्या ऑनलाइन अर्जाची प्रिंटआउट घेणे आवश्यक आहे.<br><br>C. छायाचित्र व स्वाक्षरी अपलोड (-Upload of Photo / Signature॰) करण्यासाठी मार्गदर्शक तत्त्वे<br><br>ऑनलाइन अर्ज करण्यापूर्वी उमेदवाराने खाली दिलेल्या वैशिष्ट्यांनुसार त्याचा/तिचा फोटो, स्वाक्षरी असणे आवश्यक आहे.<br><br>- छायाचित्र प्रतिमा (रूंदी ३.५cm x उंची ४.५cm)<br><br>• छायाचित्र अलीकडील पासपोर्ट शैलीचे रंगीत चित्र असणे आवश्यक आहे.<br>• हलक्या रंगाच्या, शक्यतो पांढऱ्या, पार्श्वभूमीच्या विरुद्ध घेतलेले असावे.<br>• टोपी आणि गडद चष्मा स्वीकार्य नाहीत.<br>• परिमाण २०० x २३० पिक्सेल (प्राधान्य )<br>• फाइलचा आकार २०kb - ५० kb दरम्यान असावा<br>• स्कॅन केलेल्या प्रतिमेचा आकार ५०kb पेक्षा जास्त नसावा. |

| | |
|---|---|
| | ✚ स्वाक्षरी:<br>• अर्जदाराला काळ्या शाईच्या पेनने पांढऱ्या कागदावर सही करावी लागेल.<br>o परिमाण १४० x ६० पिक्सेल (प्राधान्य)<br>o फाइलचा आकार १०kb - २०kb दरम्यान असावा. स्कॅन केलेल्या प्रतिमेचा आकार २०kb पेक्षा जास्त नाही याची खात्री करा.<br>✚ कागदपत्रे स्कॅन करणे :<br>• स्कॅनर रिझोल्यूशन किमान २०० dpi वर सेट करा<br>• रंग true colour सेट करा<br><br>✚ कागदपत्रे अपलोड करण्याची प्रक्रिया:-<br>• ऑनलाईन अर्ज भरताना उमेदवाराला छायाचित्र, स्वाक्षरी अपलोड करण्यासाठी स्वतंत्र लिंक प्रदान केल्या जातील.<br>• संबंधित लिंकवर क्लिक करा "छायाचित्र / स्वाक्षरी अपलोड करा" (-Upload of Photo / Signature॰)<br><br>✚ तुमचा फोटो, स्वाक्षरी अपलोड केल्याशिवाय तुमचा ऑनलाइन अर्ज नोंदणीकृत होणार नाही.<br>१) छायाचित्रातील चेहरा किंवा स्वाक्षरी अस्पष्ट असल्यास उमेदवाराचा अर्ज नाकारला जाऊ शकतो.<br>२) ऑनलाइन अर्जामध्ये छायाचित्र / स्वाक्षरी अपलोड केल्यानंतर उमेदवारांनी प्रतिमा स्पष्ट आहेत आणि योग्यरित्या अपलोड केल्या आहेत हे तपासावे.<br>३) उमेदवाराने हे सुनिश्चित केले पाहिजे की अपलोड करावयाचा फोटो आवश्यक आकाराचा आहे आणि चेहरा स्पष्टपणे दिसला पाहिजे.<br>**टीप :-**<br>**ऑनलाइन नोंदणी केल्यानंतर उमेदवारांनी त्यांच्या प्रणालीद्वारे तयार केलेल्या ऑनलाइन अर्जाची प्रिंटआउट घ्यावी.** |
| ३.१० | अर्ज सादरीकरण<br>१. सदर अर्ज www.          .com **या संकेतस्थळावर** दिनांक      /      /२०२३ रोजी पासून भरणेसाठी उपलब्ध होतील.<br>२. कृपया लक्षात घ्या की, उमदेवारांनी परीक्षा शुल्क दिलेल्या पेमेंट गेटवे द्वारे ऑनलाईन पद्धतीने अदा करावे. |
| ३.११ | **सर्वसाधारण सूचना**<br>१. नोंदणी व अर्ज भरण्याची प्रक्रिया उमेदवाराने स्वतःच करणे आवश्यक आहे.<br>२. अर्ज मराठी व इंग्रजीमध्ये उपलब्ध करून देण्यात आला असला, तरी संगणक प्रक्रियेकरिता अर्ज इंग्रजीमध्ये भरणे आवश्यक आहे. संक्षिप्तपणे (Abbreviations) वा अद्याक्षरे (Initials) न देता संपूर्ण नाव व संपूर्ण पत्ता नमूद करावा. नावाच्या / पत्त्याच्या दोन भागांमध्ये एका स्पेसने जागा सोडावी. |

| | |
|---|---|
| | ३. महिला उमेदवारांनी त्यांच्या नावात काही बदल असल्यास (लग्नापूर्वीचे नाव, लग्नानंतरचे नाव) त्यासंदर्भात आवश्यक कागदपत्रे, विवाह नोंदणी दाखला जमा करणे आवश्यक आहे.<br>४. एस.एस.सी. अथवा तत्सम प्रमाणपत्रांवरील नावाप्रमाणे अर्ज भरावेत. त्यानंतर नाव बदलले असल्यास अथवा प्रमाणपत्रातील नावात कोणत्याही प्रकारचा बदल झाला असल्यास, त्यासंबंधीच्या बदलासंदर्भातील राजपत्राची प्रत कागदपत्र पडताळणीच्या वेळी सादर करावी.<br>५. पत्रव्यवहारासाठी स्वतःचा पत्ता इंग्रजीमध्ये लिहावा. व्यावसायिक मार्गदर्शन केंद्र, स्वयं अध्ययन मार्गदर्शन केंद्र / वर्ग अथवा तत्सम स्वरुपाच्या कोणत्याही मार्गदर्शक केंद्राचा / संस्थेचा पत्ता पत्रव्यवहारासाठी देवू नये.<br>६. अर्जामध्ये केलेला दावा व कागदपत्रे तपासणीचे वेळी सादर केलेल्या सारांशपत्रातील अथवा सादर केलेल्या कागदपत्रांतील दावा यामध्ये फरक आढळून आल्यास अर्जामधील माहिती अनधिकृत समजण्यात येईल. अर्जामधील माहिती संदर्भातील कागदोपत्री पुरावे सादर करू न शकल्यास / न मिळाल्यास उमेदवारी रद्द करण्यात येईल.<br>७. संबंधित पदाच्या / परीक्षेच्या जाहिरात/ अधिसूचनेमध्ये दिलेल्या सर्व सूचनांचे काळजीपूर्वक अवलोकन करुनच अर्ज सादर करावा. अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारेच पात्रता आजमावली जाईल व त्याच्या आधारे निवड प्रक्रिया पूर्ण होईल. |
| ३.१२ | वरील कार्यपध्दती ही अर्ज करण्याची योग्य पध्दत आहे याशिवाय दुसऱ्या पध्दतीने केलेले अर्ज हे अवैध ठरविण्यात येतील |
| ३.१३ | उमेदवाराने अर्जात स्वतःचे नाव, सामाजिक प्रवर्ग, कोणत्या प्रवर्गातून अर्ज करू इच्छित आहे तो प्रवर्ग, जन्मदिनांक, भ्रमणध्वनी क्रमांक व ई-मेल आयडी इत्यादी माहिती काळजीपूर्वक भरावी. सदरची माहिती चुकल्यास त्यास जिल्हा परिषद ________ जबाबदार राहणार नाही. |
| ३.१४ | उमेदवाराने अर्जावर केलेली स्वाक्षरी ही त्याच्या प्रवेशपत्रावर / उपस्थितीपत्रावर एकाच प्रकारची असेल याची दक्षता घ्यावी. तसेच उमेदवाराने ऑनलाईन अर्जावर अपलोड केलेले छायाचित्र वरील प्रमाणे सर्व ठिकाणी एकच असेल याची दक्षता घ्यावी. |
| ३.१५ | अर्ज सादर केलेल्या उमेदवारांस प्राथमिक छाननीच्या आधारे परीक्षेस बसण्याची परवानगी देण्यात येईल. त्यामुळे उमेदवार परीक्षा उत्तीर्ण झाला तरी आवश्यक ती शैक्षणिक व इतर अर्हता असल्याशिवाय व आवश्यक कागदपत्रांची पूर्तता केल्याशिवाय निवडीस पात्र राहणार नाही. केवळ परीक्षा उत्तीर्ण झाल्यामुळे उमेदवारांस निवडीचा कोणताही हक्क प्राप्त होणार नाही. त्यामुळे उमेदवारांनी पात्रतेच्या अटी अभ्यासूनच अर्ज करावा. |
| ३.१६ | भरती प्रक्रियेच्या संदर्भातील सर्व माहिती व त्यानुषंगाने होणा-या बदलाबाबतची सर्व माहिती केवळ www. .com या संकेतस्थळावर उपलब्ध होईल, याव्यतिरिक्त कोणत्याही माध्यमाव्दारे भरती प्रक्रियेची माहिती उपलब्ध होणार नाही, याची उमेदवारांनी नोंद घ्यावी. |
| ३.१७ | विहित दिनांकानंतर व विहित वेळेनंतर आलेला कोणताही अर्ज संगणकीय प्रणालीमध्ये स्विकृत केला जाणार नाही. |
| ३.१८ | वय, शैक्षणिक अर्हता, मागासवर्ग / नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र, दिव्यांग, महिला, माजी सैनिक, अनाथ, प्रकल्पग्रस्त, भूकंपग्रस्त, अंशकालीन कर्मचारी, खेळाडू, अनुभव, पात्रता इत्यादी संदर्भात न चुकता अर्जामध्ये स्पष्टपणे / निर्विवादपणे दावा करणे आवश्यक आहे. अर्जातील संबंधित रकान्यात स्पष्टपणे |

| | |
|---|---|
| | दावा केला नसल्यास, संबंधीत दाव्याचा विचार केला जाणार नाही. उमेदवाराने अर्ज सादर केलेनंतर त्यामध्ये कोणत्याही प्रकारचा बदल करता येणार नाही. |
| ३.१९ | १. ज्या उमेदवारांना यापूर्वी त्यांचे नाव रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्राकडे सेवायोजन कार्यालय / समाज कल्याण / आदिवासी विकास प्रकल्प अधिकारी/जिल्हा सैनिक बोर्ड/अपंग कल्याण कार्यालय इ. कार्यालयात नोंदविलेले आहे अशा उमेदवारांनी देखील स्वतंत्ररित्या ऑनलाईन अर्ज करणे आवश्यक राहील, तसेच समांतर आरक्षणांतर्गत येणाऱ्या उमेदवारांनी देखील स्वतंत्ररित्या ऑनलाईन अर्ज सादर करणे आवश्यक आहे. |

## ४. परीक्षा

| | |
|---|---|
| ४.१ | जाहिरातीत नमूद पदाकरिता अर्ज केलेल्या परीक्षेकरीता पात्र ठरलेल्या उमेदवारांचे परीक्षेचे प्रवेशपत्र (Hall Ticket) www. .com या संकेतस्थळावर परीक्षेच्या किमान ७ (सात) दिवस अगोदर त्यांच्या प्रोफाईलद्वारे उपलब्ध करून देण्यात येतील. उमेदवारांनी परीक्षा प्रवेशपत्र स्वतः संकेतस्थळावरुन काढून घ्यावे. |
| ४.२ | परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेशपत्राची प्रिंट व ओळखीचा पुरावा (छायाप्रतीसह) सोबत ठेवणे बंधनकारक आहे. त्याशिवाय कोणत्याही उमेदवारांस परीक्षेस बसण्यास परवानगी दिली जाणार नाही. परीक्षेनंतर प्रस्तुत प्रवेशपत्र स्वतःजवळ जपून ठेवावे व परीक्षा कक्षात प्रवेश पत्र व ओळखीच्या पुराव्याची छायाप्रत जमा करावी.<br><br>**परीक्षा केंद्रांची शहरे (संभाव्य)**<br>**१. २. ३. ४. ५. ६. ७.**<br>*** परीक्षा केंद्र प्रवेश पत्रावर ठरवून दिलेप्रमाणे असतील. अर्जदाराने मागणी केलेल्या केंद्राव्यतिरिक्त अन्य / नवीन केंद्र दिले जाऊ शकते. याबाबत कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.** |
| ४.३ | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडील शासन परिपत्रक क्र.दिव्यांग २०१९/प्र.क्र.२००/दि.क.२, दि. ०५ ऑक्टोबर, २०२१ अन्वये दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील कलम २(आर) नुसार लक्षणीय (Benchmark) दिव्यांग व्यक्तींना स्पर्धा परीक्षेस बसताना लेखनिक उपलब्ध करून देणेबाबतच्या सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्याप्रमाणे लक्षणीय (Benchmark) दिव्यांगत्व असलेल्या दिव्यांग व्यक्तींनी लेखनिक पुरविणे आणि / अथवा अनुग्रह कालावधी देणेसाठीची अर्ज भरताना स्पष्ट मागणी करणे आवश्यक आहे. उमेदवाराने परीक्षेपुर्वी लेखनिकाची मागणी न केल्यास ऐनवेळी लेखनिक पुरविता येणार नाही.<br>१. लक्षणीय (Benchmark) दिव्यांग व्यक्तींच्या वर्गवारीमधील अंधत्व / शारीरिक दिव्यांगत्व (दोन्ही हात बाधित / नसलेले) / मेंदूचा पक्षाघात आसलेल्या दिव्यांग परिक्षार्थीना लेखनिक / वाचक / प्रयोगशाळा सहाय्यक यांची सुविधा उपलब्ध करून देणेत येईल.<br>२. लक्षणीय (Benchmark) दिव्यांगत्व असलेल्या इतर प्रकारांतील दिव्यांग परिक्षार्थीच्या बाबतीत उमेदवारांने लेखनिक / वाचक / प्रयोगशाळा सहाय्यक आवश्यक असल्याबाबतचे शासकीय रूग्णालयातील मुख्य वेद्यकीय अधिकारी / जिल्हा शल्य चिकित्सक / वैद्यकीय अधिक्षक यांनी |

| | |
|---|---|
| | प्रमाणित केलेले विहित नमुन्यातील (Appendix-१) प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच लेखनिक / वाचक / प्रयोगशाळा सहाय्यक पुरविणेत येईल. सदरचे प्रमाणपत्र दिव्यांग उमेदवाराने परीक्षेच्या दिवशी सादर करणे बंधनकारक आहे. **(Appendix-I सोबत जोडणेत आले आहे)**<br><br>लक्षणीय (Benchmark) दिव्यांग उमेदवाराने अर्ज करतेवेळी लेखनिक / वाचक / प्रयोगशाळा सहाय्यक पुरविणेची मागणी केल्यास सदर उमेदवाराला जिल्हा परिषदेमार्फत लेखनिक पुरविण्यात येईल. दिव्यांग व्यक्तींना लेखनिक पुरविणे आणि / अथवा अनुग्रह कालावधी देणेसाठीच्या सर्व मार्गदर्शक सूचना www. .com या जिल्हा परिषदेच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करणेत येईल, यांची उमेदवारांनी नोंद घ्यावी. |
| ४.४ | ज्या उमेदवारांना परीक्षेच्या दिवशी सहाय्यकाची मदत पुरविण्यात आली आहे. अशा उमेदवारांना व सर्व अल्पदृष्टी उमेदवारांना पेपर सोडविण्यासाठी प्रत्येक तासाला २० मिनिटे अतिरिक्त वेळ दिला जाईल. तथापि अशा उमेदवाराने परीक्षेच्या वेळी अपंगत्वाचे प्रमाण किमान ४०% असल्याबाबतचे मूळ प्रमाणपत्र व त्याची साक्षांकित छायांकित प्रत सोबत आणणे आवश्यक आहे. |
| ४.५ | ऑनलाईन परीक्षेनंतर जरुरी प्रमाणे पात्र उमेदवारांना महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभागाकडील शासन निर्णय दि. ०४ मे २०२२ अन्वये कागदपत्रे पडताळणीकरिता बोलावण्यात येईल. |
| ४.६ | काही अपरिहार्य कारणास्तव परिक्षेच्या तारखांमध्ये / परिक्षेच्या ठिकाणामध्ये बदल करावा लागल्यास त्याबाबतची माहिती www. .com **या _________ जिल्हा परिषदेच्या संकेतस्थळावर** प्रसिध्द करण्यात येईल. याबाबत लेखी स्वरूपात कोणत्याही प्रकारे पत्रव्यवहार केला जाणार नाही. |
| ४.७ | **ओळख पटवणे**<br>१. परीक्षा केंद्रावर प्रवेशपत्रासह उमेदवाराचे ओळख पटवणारे मूळ कागदपत्रासह व उमेदवाराचा अलीकडच्या काळातील फोटो असलेले वैध फोटो ओळखपत्र जसे पॅन कार्ड (Pan Card) / पारपत्र (Passport) / वाहनचालक परवाना (Driving License) / मतदार ओळखपत्र (Voter ID) / आधार कार्ड, बँक/पोस्ट फोटोसहीतचे पासबुक / शासकीय कर्मचारी ओळखपत्र / फोटोसहीत असणारे नोंदणीकृत विद्यापीठ/कॉलेज चे फोटोसहित ओळखपत्र / बार कौन्सिलचे ओळखपत्र हे समवेक्षक/ पर्यवेक्षकाला सादर करणे आवश्यक आहे. उमेदवाराचे प्रवेशपत्र, हजेरीपत्रक / उपस्थितीपत्रक आणि त्याने सादर केलेल्या कागदपत्रांच्या आधारे उमेदवाराची ओळख पटविली जाईल. जर उमेदवाराची ओळख पटवण्याबाबत काही शंका उपस्थित झाल्यास किंवा ओळख शंकास्पद असल्यास त्याला परीक्षेसाठी उपस्थित राहू दिले जाणार नाही, सदर उमदेवाराचे मूळ प्रवेशपत्र व ओळखपत्राची एक छायाप्रत परीक्षा हॉलमध्ये जमा करणे आवश्यक राहील.<br>टिप - उमेदवाराने परीक्षेला उपस्थित राहताना स्वतःची ओळख पटविण्यासाठीची आवश्यक ती मुळ कागदपत्रे, त्या कागदपत्रांच्या छायांकित प्रती परीक्षेच्या प्रवेशपत्रासह सादर करणे आवश्यक आहे. परीक्षेच्या प्रवेशपत्रावरील नाव (परीक्षेसाठी नोंदणी केल्यानुसार) सोबत सादर करण्यात येणाऱ्या ओळखपत्राशी तंतोतंत जुळणे आवश्यक आहे. ज्या महिला उमेदवारांच्या पहिल्या / मधल्या / शेवटच्या नावात विवाहानंतर फरक पडला असेल त्यांनी याबाबत विशेष खबरदारी घेणे आवश्यक आहे. सदर महिला उमेदवारांनी नावात बदल झाल्याबाबतचे राजपत्र / विवाह नोंदणी प्रमाणपत्र |

| | |
|---|---|
| | यापैकी एक पुरावा सादर करणे आवश्यक आहे. परीक्षेचे प्रवेशपत्र व सादर करण्यात आलेले फोटो ओळखपत्र यामधील नावात कोणतीही तफावत आढळल्यास उमेदवारास परीक्षेला उपस्थित राहू दिले जाणार नाही.<br>**रेशनकार्ड, शिकाऊ वाहन परवाना ओळखपत्र म्हणून ग्राह्य धरला जाणार नाही.**<br>२. परीक्षेला उशिरा येण्याबाबत - परीक्षेच्या प्रवेशपत्रात परीक्षेला हजर राहण्यासाठी दिलेल्या वेळेनंतर येणाऱ्या उमेदवारांना परीक्षेला उपस्थित राहू दिले जाणार नाही. प्रवेशपत्रावरील परीक्षेसाठी उपस्थित राहण्याची वेळ ही प्रत्यक्ष परीक्षा सुरू होणाच्या आधीची असणार आहे. परीक्षेची वेळ जरी दोन तास (१२० मिनिटे) असली तरी उमेदवारास ओळख पटवणे. आवश्यक कागदपत्रे गोळा करणे, सूचना देणे या सर्व बाबी पूर्ण करण्यासाठी साधारण एक तास आधी परीक्षा केंद्रावर उपस्थित रहावे लागेल.<br><br>३. निवड प्रक्रिये दरम्यान गैरवर्तणूक / अनुचित प्रकार / गैरप्रकार करताना दोषी आढळलेल्या उमेदवारांवर करण्यात येणारी कार्यवाही -<br>उमेदवाराने त्याच्या हितासाठी खोटी व चुकीची माहिती / तपशिल देवू नये, खोटी माहिती तथा खोटा तपशिल तयार करून सादर करू नये किंवा कोणतीही माहिती ऑनलाईन अर्ज भरताना दडवून ठेवू नये. जर उमेदवाराने खोटी माहिती तथा खोटा तपशिल तयार करून सादर केला तर उमेदवारास अपात्र ठरविण्यात येईल व योग्य ती कायदेशीर कारवाई करण्यात येईल. |
| ४.८ | **परीक्षेच्या वेळेत किंवा एकूण निवड प्रक्रियेदरम्यान जर उमेदवाराने**<br>१. अनुचित प्रकार करणे किंवा,<br>२. तोतयेगिरी करणे किंवा तोतयांच्या सेवा वापरणे किंवा,<br>३. परीक्षेच्या ठिकाणी गैरवर्तणूक करणे किंवा परीक्षेच्या पेपरमधील माहिती किंवा तत्संबंधी काही माहिती कोणत्याही कारणासाठी पूर्ण किंवा त्याचा काही भाग तोंडी किंवा लेखी किंवा इलेक्ट्रॉनिकली किंवा मेकॅनिकली उघड करणे, प्रकाशित करणे, पाठवणे, साठवणे किंवा,<br>४. स्वतः च्या उमेदवारीबद्दल अनियमित किंवा अयोग्य पध्दतीचा अवलंब करणे किंवा, स्वतःच्या उमेदवारीबद्दल गैरमार्गाने पाठिंबा मिळविणे किंवा, दळणवळणाची भ्रमणध्वनी किंवा तत्सम इलेक्ट्रॉनिक साधने यांचा वापर परीक्षेच्या ठिकाणी करणे,<br>७. परीक्षा कक्षातील परीक्षा नियंत्रण अधिकारी याच्याशी अरेरावी करणे उद्धटपणे वागणे त्यांना लाच देऊ पाहणे.<br>अशा कृत्यांमध्ये दोषी आढळल्यास अशा उमेदवारास फौजदारी कार्यवाहीस सामोरे जावे लागेल तसेच सदर उमेदवारास परीक्षेसाठी अपात्र ठरविले जाईल.<br>१. जिल्हा परिषद ________ तर्फे घेण्यात येणाऱ्या वेगवेगळ्या परीक्षेसाठी बसण्यापासून काही ठराविक कालावधीसाठी किंवा कायमचे प्रतिरोधित (Debarred) केले जाईल.<br>२. जर उमेदवार जिल्हा परिषद ________ च्या सेवेत आधीच रुजू झाला असेल तर त्याची सेवा समाप्त केली जाईल. |

## ५. परीक्षा केंद्र

| | |
|---|---|
| ५.१ | १. सदर परीक्षा प्रवेश पत्रामध्ये नमूद केलेल्या परीक्षा केंद्रावर "ऑनलाईन पद्धतीने परीक्षा घेतली जाईल<br>२. परीक्षा केंद्र, परीक्षेचे ठिकाण, दिनांक, वेळ व सत्र इत्यादी बाबत बदलाची विनंती मान्य केली जाणार नाही<br>३. उमदेवारांनी आपल्या जबाबदारीवर स्वखर्चाने परीक्षा केंद्रावर उपस्थित राहावायचे आहे या संबंधात कोणत्याही प्रकारच्या हानी / नुकसानीस जिल्हा परिषद ________ जबाबदार राहणार नाही. |

## ६. पदसंख्या

| | |
|---|---|
| ६.१ | जिल्हांतर्गत गट - क मधील खालील तक्त्यात नमूद केलेल्या विविध संवर्गाच्या संख्येप्रमाणे भरावयाच्या सर्व पदांचा तपशिल सोबतचे **परिशिष्ट (अ-१) व परिशिष्ट (अ-२)** मध्ये नमूद केल्याप्रमाणे आहे. |

६.२ अनुसूचित क्षेत्राबाहेरील (बिगर पेसा) सरळसेवेची रिक्त पदे पदभरतीसाठी संवर्गनिहाय घोषित पदे पुढील प्रमाणे आहेत.

| अ.क. | संवर्ग | पद संख्या |
|---|---|---|
| १ | आरोग्य पर्यवेक्षक | |
| २ | आरोग्य सेवक (पुरूष) ४०% | |
| ३ | आरोग्य सेवक (पुरूष) ५०% | |
| ४ | आरोग्य सेवक (महिला) | |
| ५ | औषध निर्माण अधिकारी | |
| ६ | कंत्राटी ग्रामसेवक | |
| ७ | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य / ग्रा.पा.पु. / लघु पाटबंधारे ) | |
| ८ | कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) | |
| ९ | कनिष्ठ अभियंता (विद्युत) | |
| १० | कनिष्ठ आरेखक | |
| ११ | कनिष्ठ यांत्रिकी | |
| १२ | कनिष्ठ लेखाधिकारी | |
| १३ | कनिष्ठ सहाय्यक (लिपीक) | |
| १४ | कनिष्ठ सहाय्यक लेखा | |
| १५ | जोडारी | |
| १६ | तारतंत्री | |

| अ.क. | संवर्ग | पद संख्या |
|---|---|---|
| १७ | पर्यवेक्षिका | |
| १८ | पशुधन पर्यवेक्षक | |
| १९ | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | |
| २० | यांत्रिकी | |
| २१ | रिगमन (दोरखंडवाला) | |
| २२ | लघुटंकलेखक | |
| २३ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | |
| २४ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | |
| २५ | वरिष्ठ सहाय्यक (लिपीक) | |
| २६ | वरिष्ठ सहाय्यक लेखा | |
| २७ | विस्तार अधिकारी (कृषि) | |
| २८ | विस्तार अधिकारी (पंचायत) | |
| २९ | विस्तार अधिकारी (शिक्षण) (वर्ग३ श्रेणी२) | |
| ३० | विस्तार अधिकारी (सांख्यिकी) | |
| ३१ | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक (स्थापत्य / लघु पाटबंधारे) | |
| | एकूण | |

६.३ अनुसूचित क्षेत्रातील (पेसा) रिक्त पदे पदभरतीसाठी संवर्गनिहाय घोषित पदे

| अ.क. | संवर्ग | पद संख्या |
|---|---|---|
| १ | आरोग्य सेवक पुरूष (४०%) | |
| २ | आरोग्य सेवक पुरूष (५०%) | |
| ३ | आरोग्य सेवक महिला (१००%) | |
| ४ | कंत्राटी ग्रामसेवक | |
| ५ | पर्यवेक्षिका | |
| ६ | पशुधन पर्यवेक्षक | |
| | एकूण | |

